**पुणे महानगरपालिका,**
**पुणे शहरातील पे ॲण्ड पार्क बाबत ठेकेदारांना मुदत वाढवून देण्याबाबतचा मुख्य सभा ठराव क्र. ५३४, दिनांक १८.२.२०११ अंशत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएमसी-३०१४/प्र.क्र.१११/नवि-२२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १२ मे,२०१५

<u>वाचा</u> :- १) अतिरिक्त नगर अभियंता (प्रकल्प) यांचे पत्र क्र. वानि/४३७७, दि. १६.१.२०१४
२) अतिरिक्त नगर अभियंता (प्रकल्प) यांचे पत्र क्र. वानि./५६२१, दि. २६.३.२०१४
३) शासन पत्र समक्रमांक दि. २१ मार्च, २०१४ चे पत्र
४) अतिरिक्त नगर अभियंता (प्रकल्प) यांचे पत्र क्र. वानि./१०६०, दि. ६.६.२०१४
५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २३.६.२०१४
६) अतिरिक्त नगर अभियंता (प्रकल्प) यांचे पत्र क्र. वानि./३२००, दि. २९.१०.२०१४

**<u>प्रस्तावना :-</u>**

पुणे शहरातील पे ॲन्ड पार्क साठी नियुक्त केलेल्या ठेकेदारास मक्त्याची मुदत वाढवून देण्याबाबत पुणे महानगरपालिकेचा महासभा ठराव क्र. ५३४, दिनांक १८.२.२०११ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम ४५१ अन्वये कार्यवाही करण्याबाबत आयुक्त, पुणे महानगरपालिका यांच्या संदर्भाधिन दिनांक १६.१.२०१४ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने महानगरपालिकेकडून अधिक माहिती मागविली होती. सदर माहिती ६.६.२०१४ च्या पत्रान्वये महानगरपालिकेकडून सादर करण्यात आली होती. महानगरपालिकेचा ठराव क्र. ५३४, दिनांक १८.२.२०११ मधील " पे ॲन्ड पार्क योजनेअंतर्गत मुळ मुदतीनंतर दिनांक ३१.३.२०१५ पर्यंत मुदतवाढ देणेस तसेच मुळ मुदतीची ठेक्याची उर्वरित रक्कम पुढील प्रत्येक वर्षी समान हप्त्यामध्ये घेण्यास मान्यता देण्यात येत आहे." या प्रमाणे अंमलबजावणी केल्यास महानगरपालिकेचे आर्थिक नुकसान होईल, असे शासनाच्या निदर्शनास आले.

या अनुषंगाने सदर ठरावातील भाग अंशत: निलंबित करणे व त्यात अंशत: सुधारणा करणे योग्य होईल अशी शासनाची खात्री झाल्याने संदर्भ क्र. ५ येथील दिनांक २३.६.२०१४ च्या शासन निर्णयान्वये महासभा ठराव क्र. ५३४, दिनांक १८.२.२०११ मधील भाग अंशत: निलंबित करण्यात आला व त्यामध्ये " पे ॲन्ड पार्क योजनेसाठी या शासन निर्णयाच्या दिनांकानंतर तीन महिन्यापर्यंत मुदतवाढ देण्यास तसेच मक्ता रक्कम तीन टप्प्यात भरण्यास मान्यता देण्यात येत आहे, आणि या वाढीव तीन महिन्याच्या मुदतीत सदर योजनेसाठी नव्याने पारदर्शक निविदा प्रक्रिया पार पाडून ठेकेदाराची नियुक्ती करण्यासाठी योग्य ती कार्यवाही महानगरपालिकेने करावी." असा भाग समाविष्ट करण्यात आला आहे. सदर दिनांक २३.६.२०१४ च्या शासन निर्णयाविरुध्द पुणे महानगरपालिकेकडून कोणतेही अभिवेदन प्राप्त झालेले नसल्यामुळे शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

आयुक्त, पुणे महानगरपालिका यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील मुद्दे विचारात घेवून त्यानुसार पुणे महानगरपालिकेने दिनांक १८.२.२०१४ च्या महासभेचा ठराव क्रमांक ५३४ मधील **“पे ॲन्ड पार्क योजनेअंतर्गत मुळ मुदतीनंतर दिनांक ३१.३.२०१५ पर्यंत मुदतवाढ देणेस तसेच मुळ मुदतीची ठेक्याची उर्वरित रक्कम पुढील वर्षी समान हप्त्यामध्ये घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.”** हा भाग विखंडीत करण्यात येत असून त्याऐवजी **“पे ॲन्ड पार्क योजनेसाठी या शासन निर्णयाच्या दिनांकानंतर तीन महिन्यापर्यंत मुदतवाढ देण्यास तसेच मक्ता रक्कम तीन टप्प्यात भरण्यास मान्यता देण्यात येत आहे, आणि या वाढीव तीन महिन्याच्या मुदतीत सदर योजनेसाठी नव्याने पारदर्शक निविदा प्रक्रिया पार पाडून ठेकेदाराची नियुक्ती करण्यासाठी योग्य ती कार्यवाही महानगरपालिकेने करावी.”** असा भाग समाविष्ट करण्यास, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५१ (३) अन्वये प्राप्त अधिकारान्वये मान्यता देण्यात येत आहे. उक्त ३ महिन्यांची मुदत संदर्भाधीन दिनांक २३.६.२०१४ च्या शासन निर्णयापासून राहील.

२. उपरोक्त निर्देशानुसार पुणे महानगरपालिकेने आवश्यक कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१२१११०८१३५८२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: CN = Eknath Kisan Sahane, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.05.12 11:11:04 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
४) नगर सचिव, पुणे महानगरपालिका, पुणे.
५) कक्ष अधिकारी (संगणक शाखा) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना सदर शासन निर्णय विभागाच्या वेबसाईटवर अपलोड करण्यासाठी अग्रेषित.
६) निवड नस्ती (नवि-२२)